**महात्मा ज्योतिबा फुले विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था व इतर ७ संस्थांमध्ये सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२३ ते ३१/०८/२०२३ पर्यंत चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - विकासे ०२२३/प्र.क्र.४७/१८-स,**

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : २० फेब्रुवारी, २०२३

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ०५.०५.२०११.

२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र. जा.क्र. आस्थापना/कक्ष-४/म.ज्यो.फुले/मुदतवाढ/२०२३, दि. १४/०२/२०२३.

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. विकासे ०३२२/प्र.क्र.३३/१८-स, दिनांक ०४/१०/२०२२.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ०८/०२/२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/ अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत २ पदांचा समावेश आहे. उपरोक्त संदर्भ क्र. ३ अन्वये महात्मा ज्योतिबा फुले विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था व इतर ७ संस्थांमध्ये सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी एकूण २ अस्थायी पदांना दि. २८/०२/२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदतवाढ संपुष्टात आल्याने महात्मा ज्योतिबा फुले विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था व इतर ७ संस्थांमध्ये सतत व समवर्ती लेखापरिक्षण योजना राबविणेबाबत लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली २ अस्थायी पदे सन २०२३-२४ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी वर नमूद केलेल्या संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत शासनास प्रस्ताव सादर केला आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त बाब विचारात घेऊन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था. महाराष्ट्र राज्य पुणे, यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ च्या प्रस्तावानुसार महात्मा ज्योतिबा फुले विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था

व इतर ७ संस्था योजना मधील खालील २ अस्थायी पदांना **दि.०१/०३/२०२३ पासून दि. ३१/०८/२०२३ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मंजूरी देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतन श्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उपलेखापरीक्षक | एस-०८-२५५००-८११०० | १ |
| २ | कनिष्ठ लिपिक | एस-०६-१९९००-६३२०० | १ |
| | | | २ |

वरील योजनावरील एकूण ०२ अस्थायी पदांचा होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र.व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष "२४२५- सहकार, १०१- सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण, १०१- (एक) (ए) लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. परंतू ही अस्थायी पदे विहीत पध्दतीने भरली आहेत या अटीच्या अधीन राहून ही मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०८/०२/२०२३ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२०१८२६४६५१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.02.20 18:30:26 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
३) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी, ५-स / १२-स, / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई.

५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (कोल्हापूर)
८) जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, (कोल्हापूर)
९) जिल्हा कोषागार अधिकारी, (कोल्हापूर)
१०) जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (कोल्हापूर)
११) विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, (महात्मा ज्योतिबा फुले),कोल्हापूर.
१२) निवड नस्ती.